**रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील ०७ नियमित पदांचा + बाह्ययंत्रणेव्दारे सेवा उपलब्ध करुन घ्यावयाच्या ०४ पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आकृबं-२०२१/प्र.क्र.१९४/आस्थापना**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २९ मे, २०२३.

संदर्भ : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२००१/प्र.क्र.२९८/सां.का.१, दि.२३.०३.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि.११.०२.२०१६
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पदनि-०६१७६/प्र.क्र.२०/आपुक-१, दि.२९.०६.२०१७
४) वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०२३/ प्र.क्र.१३/आपुक, दि.१०.०४.२०२३ सोबतचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या आकृतिबंधानुसार रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयामध्ये एकूण ११ पदे मंजूर आहेत. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय, वित्त विभाग, दि.११.०२.२०१६ अन्वये, प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि.२९.०६.२०१७ अन्वये सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०६.०३.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयाचा ११ पदांचा सुधारीत आकृतिबंधाचा प्रस्ताव विचारार्थ ठेवण्यात आला. सदरहू बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विभागास प्राप्त झाले असून रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील '७ नियमित पदे + बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या ४ मनुष्यबळ सेवा' अशा सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये सोबतच्या विवरणपत्र- 'अ' व 'ब' मध्ये दर्शविल्याप्रमाणे, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील '७ नियमित पदे + बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या ४ मनुष्यबळ सेवा' या पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात येत आहे. 'विवरणपत्र -अ' मधील अ.क्र.५ व ६ येथे दर्शविण्यात आलेली पदे मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात येत आहेत. अ.क्र.५ व ६ येथील मृत संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत आहेत, त्या पदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती किंवा अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यानंतर सदरचे पद आपोआप रद्द होईल. तद्नंतर 'विवरणपत्र-ब' मध्ये दर्शविलेल्या सेवा आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेव्दारे घेण्यात याव्यात. 'मृत संवर्ग' घोषित करण्यात आलेल्या संवर्गात सध्या कार्यरत असलेल्या पदांचा तपशिल 'विवरणपत्र-क' मध्ये दर्शविण्यात आला आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१५/आपुक, दि.२३.०५.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२९१२४४०३९३२३ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.05.29 14:59:28 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत : विवरणपत्र - 'अ', 'ब' व 'क'**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य )/मा. मंत्री(पर्यटन) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव(गृह) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव( नियोजन) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव( सेवा) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव( व्यय) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव ( ले.व को.) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई..
१०. महालेखापाल-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
११. सर्व उप सचिव यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, आपुक/व्यय-१५/अर्थसं-११, वित्तीय सुधारणा मंत्रालय, मुंबई.
१४. सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई.
१५. निवडनस्ती.

**शासन निर्णय,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१९४/आस्थापना, दि. २९ मे, २०२३ सोबतचे विवरणपत्र**

**'विवरणपत्र-अ'**

**नियमित पदे -७**

| अ. क्र. | पदनाम | वेतनसंरचना | प्रचलीत आकृतीबंधा नुसार मंजूर पदे | उच्च स्तरीय समितीने सुधारीत आकृतीबंधा नुसार मंजूर केलेली पदे |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | सचिव | S-१५ :४१८००-१३२३०० | १ | १ |
| २ | अधीक्षक | S-१४ : ३८६०० - १२२८०० | १ | १ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | S-८ : २५५००-८११०० | १ | १ |
| ४ | लिपिक - टंकलेखक | S-६ : १९९००-६३२०० | ४ | ४ |
| ५ | दप्तरी | S-३ : १६६००-५२४०० | १ | मृत संवर्ग |
| ६ | शिपाई | S-१ : १५०००-४७६०० | २ | मृत संवर्ग |
| **एकूण** | | | **१०** | **७ नियमित पदे** |

**टीप** - अ.क्र.५ व ६ येथील मृत संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत आहेत, त्या पदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती किंवा अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यानंतर सदरचे पद आपोआप रद्द होईल. तद्नंतर 'विवरणपत्र-ब' मध्ये दर्शविलेल्या सेवा आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेव्दारे घेण्यात याव्यात.

**ब) बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा - ४ पदे**

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | निम्नश्रेंणी लघुलेखक | ०१ |
| २ | बहुउद्देशिय गट ड कर्मचारी | ०३ |
| एकूण | | ०४ |

**टीप** - 'विवरणपत्र -अ' मधील अ.क्र.५ व ६ येथील संवर्गात सध्या कार्यरत असलेली पदे वगळून उर्वरित मनुष्यबळसंख्येच्या प्रमाणात सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यात याव्यात.

**क) 'विवरणपत्र -अ' मधील अ.क्र.५ व ६ येथील संवर्गात सध्या कार्यरत असलेली पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनसंरचना | कार्यरत पदे |
|---|---|---|---|
| १ | दप्तरी | S-३ : १६६००-५२४०० | ०१ |
| २ | शिपाई | S-१ : १५०००-४७६०० | ०१ |
| एकूण | | | ०२ |

******